(५२६) 20150423115952612

लघु पाटबंधारे तलाव दह्याणे ता.जि.धुळे
सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान
करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- लपायो २००८/६६/व्हिआयपी/(२५३/२००८) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १६/०९/२००८.

पहावे :- १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्रमांक मुअ/तापाविमं/प्रशा-७/२०३५/सन-२००८ दि.३१.७.२००८

प्रस्तावना :-

दह्याणे लघु पाटबंधारे तलाव, ता.जि.धुळे या योजनेस महामंडळाकडून, महामंडळ निर्णय क्रमांक-तापाविम/का.प्र./प्रवि-१/११-९८/प्रमा-११, दि.१७.५.१९९८ अन्वये रूपये ४८६.१९ लक्ष रक्कमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर योजनेच्या प्राथमिक अन्वेषणाव्यतिरिक्त मुख्य काम अद्याप सुरू झालेले नाही. वनजमिन भूसंपादनाची किंमत मंजूर होण्यासाठी/निधी प्राप्त होण्यासाठी विलंब झालेला आहे. सदरा योजनेच्या बुडीत क्षेत्रात ३३.३७ हेक्टर वनजमिन येत असून त्याची एन.पी.व्ही. रक्कम रू.२३१.५८ लक्ष एवढी आहे. क्षेत्रिय कार्यालय, पश्चिम क्षेत्र, केंद्रीय पर्यावरण भवन, भोपाल कार्यालयाचे पत्र दिनांक १८.११.२००३ अन्वये प्रस्तुत धरणासाठी लागणारी ३३.३७ हेक्टर वनजमिन वर्ग करण्याबाबत वन खात्याची तत्वत: मान्यता मिळालेली आहे. एन.पी.व्ही. रक्कम २३१.५८ लक्ष पर्यायी वनीकरणासाठी रू. २२.०९ लक्ष व सिमेंट पिलरसाठी रू. ०.८८ लक्ष अशी एकूण रू. २५४.५६ लक्षची मागणी उपवनसंरक्षक, धुळे यांनी पत्र दिनांक १२.४.२००७ अन्वये केली आहे. त्यानुषंगाने कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी त्यांचे पत्र दिनांक २३.७.२००८ अन्वये रू. २५४.५६ लक्ष इतका निधी खास बाब म्हणून उपलब्ध करून देण्याबाबत विनंती केली आहे. तथापि त्यासाठी योजनेच्या अद्यावत किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक असल्याने कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांच्याकडून रू.११५८.४४ लक्ष किंमतीचा सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये दह्याणे लघु पाटबंधारे तलाव, ता.जि.धुळे या योजनेस सन २००८-२००९ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये ११,५८,४४,२३८/- (रूपये अकरा कोटी, अठ्ठावन लाख, चव्वेचाळीस हजार दोनशे अडतीस फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये ९,८१,०९,९२५/- व रूपय १,७७,३४,३१३/- अनुषगिक खर्च या रक्कमेस

F:\Maanegoen-order-HHP..doc

सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च (१) बांधकाम लघु पाटबंधारे योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" यावर खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (२५ /२००८) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च.डुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, धुळे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, धुळे
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक लपायो २००८/६६/व्हिआयपी(२५३/२००८) खारभूमी दि. १६/०२/२००८ चे परिशिष्ट

दह्याणे लघु पाटबंधारे तलाव, ता.जि.धुळे अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | शिर्ष कामे | एकूण रुपयात |
|---|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ८००००० | ८००००० |
| २ | "ब" (भूसंपादने) | २७८७५०२४ | २७८७५०२४ |
| ३ | "सी" मुख्य कामे | ६५७४०१९४ | ६५७४०१९४ |
| ४ | "डी" विमोचक | २२९४७०७ | २२९४७०७ |
| ५ | "ई" फॉल | -- | -- |
| ६ | "एफ" आरएचटी वर्क्स | -- | -- |
| ७ | "जी" पूल (सीटी क्रॉसींग) | -- | -- |
| ८ | "एच" एस्केप | -- | -- |
| ९ | "के" इमारती | १००००० | १००००० |
| १० | "एल" मातीकाम | -- | -- |
| ११ | "एम" वृक्षारोपन | -- | -- |
| १२ | "ओ" संकिर्ण | १५०००० | १५०००० |
| १३ | "पी" देखभाल | ५०००० | ५०००० |
| १४ | "आर" दळणवळण | ११०००००० | ११०००००० |
| १५ | वितरिका | -- | -- |
| | कामाप्रित्यर्थ किमत | ९८१०९९२५ | ९८१०९९२५ |
| | अनुषंगिक खर्च (२५.२५ टक्के भूसंपादन खर्च वगळून) | | १७७३४३१३ |
| | योजनेची एकूण किमत | | ११५८४४२३८ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ३४० हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ४२६८ सघमी |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी. किंमत (रु) (NPV वगळून) | २१७१६ < २२५३९ मापदंड बसते |
| लाभव्यय गुणोत्तर (NPV वगळून) | १.०३ > १.०० मापदंडात बसते |